**भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर या कार्यालयातील (अधिक्षक, वर्ग-२) पदावरील प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**
**श्रीमती मा.र.देशमुख, सहायक कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१०४ /१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०१ ऑक्टोबर, २०२१

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१०४ /१४-अ, दिनांक ०८-०८-२०१९ चे शासन आदेश.
२) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर यांचे क्र. भा.नि.का.न्या./संकिर्ण/प्र.क्र.१८/२०२१/आस्था/ दिनांक २०-०८-२०२१ चे पत्र.
३) श्रीमती मा.र.देशमुख, सहायक कक्ष अधिकारी (अधिक्षक वर्ग-२), भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर यांचे दिनांक १६-०६-२०२१ रोजीचे निवेदन.
४) गृहनिर्माण विभाग नस्ती क्र. नियुक्ती-२०१९/प्र.क्र.७६/२०१९/गृनिधो-१

**शासन आदेश**

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक ०८-०८-२०१९ च्या आदेशान्वये श्रीमती मा.र.देशमुख, सहायक कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग यांच्या सेवा २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर या कार्यालयात अधिक्षक, वर्ग-२ या पदावर उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. त्यानुसार श्रीमती देशमुख दिनांक २१-०८-२०१९ पासून भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर येथे प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यांचा प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी दिनांक २०-०८-२०२१ रोजी संपुष्टात आला आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/ प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

परि.क्र. ५(अ) (३) :- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा.

३. श्रीमती मा.र.देशमुख, सहायक कक्ष अधिकारी यांचे संवर्ग नियंत्रण या विभागाकडे असल्यामुळे व भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर यांचे संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक २०-०८-२०२१ च्या पत्रात श्रीमती देशमुख यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत नमूद केलेले प्रशासकीय कारण तसेच संदर्भाधिन क्र. ३ येथील निवेदनात श्रीमती देशमुख यांनी नमूद केलेली कौटुंबिक अडचण, संदर्भाधिन क्र. ४ येथील प्रस्तावान्वये गृहनिर्माण विभागाने श्रीमती देशमुख यांच्याकडे भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती येथील कार्यालयातील अतिरिक्त कार्यभार असल्याची नमूद केलेली वस्तुस्थिति विचारात घेता

श्रीमती देशमुख यांच्या प्रतिनियुक्तीस दि नांक २१-०८-२०२१ पासुन पुढे २ वर्ष (दिनांक २१-०८-२०२१ ते दिनांक २०-०८-२०२३) पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. प्रतिनियुक्ती संदर्भात सर्व अटी व शर्ती या विभागाचे आदेश क्र. प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१०४ /१४-अ, दिनांक ०८-०८-२०१९ च्या शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे असतील. त्यांच्या या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ अंतिम स्वरुपाची असून, त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर तसेच गृहनिर्माण विभागाने या विभागाकडे सादर करु नये.

५. प्रतिनियुक्ती ही संबंधित कर्मचाऱ्याची व प्रतिनियुक्तीवरील कार्यालयाची तात्पुरती व्यवस्था असून संबंधित कर्मचाऱ्याची प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यात आल्यामुळे तो/ती कार्यरत असलेल्या विभागात त्या कर्मचाऱ्याची कमतरता रिक्त पदांअभावी नेहमी जाणवते. प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयाने सदरहू कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होताच, त्याची सेवा त्याच्या मूळ विभागास प्रत्यावर्तित करावी.

६. श्रीमती मा.र.देशमुख, सहायक कक्ष अधिकारी, यांच्या अन्य प्रशासकीय बाबी महसूल व वन विभाग व गृहनिर्माण विभाग/गृनिधो-१ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००११८३८०४७७०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0,
serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.10.04 11:23:30 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती मा.र.देशमुख, सहायक कक्ष अधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर (या कार्यालयामार्फत)

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, महसूल व वन विभाग/ गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, तहसिल कार्यालय,(शहर), ईमारत, पहिला माळा, खोली क्र. २१ व २२, आकाशवाणी चौक, सिव्हील लाईन, नागपूर-४४०००१

४) सह/उप सचिव (आस्थापना), महसूल व वन विभाग/गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

५) सह/उप सचिव (गृनिधो-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

६) सा.प्र.वि./का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती)